डॉ. सुभाष शा. घाटकर, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, सार्वजनिक आरोग्य विभाग, यांच्या प्रतिनियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन आदेश क्र.औसुवआ-०९१७/प्र.क्र.८२(भाग-२)/कामगार-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २० जानेवारी, २०२२.

**संदर्भ:-** १) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्र. एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/१२, दि.१७/१२/२०१६.
२) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.स्थाप्रप-१४१५/प्र.क्र.१४/१३-अ, दि.१९/९/२०१७.
३) या विभागाचे समक्रमांकाचे दि.१३/०४/२०१८ व दि.२७/०६/२०१९ चे आदेश.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, पत्र क्र.मवैअ-२०१७/प्र.क्र.१८५/सेवा-३, दि.२५/११/२०२१.

**आदेश :-**

डॉ. सुभाष शा. घाटकर, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, सार्वजनिक आरोग्य विभाग यांची प्रमाणक शल्य चिकित्सक, गट-अ, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने संदर्भ क्र.३ येथील दि.१३.०४.२०१८ रोजीच्या आदेशान्वये प्रथमत: १ वर्षासाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानंतर, संदर्भ क्र.३ येथील दि.२७.०६.२०१९ रोजीच्या आदेशान्वये सदर प्रतिनियुक्तीस, दि.१३.०४.२०१९ पासून एक वर्षाच्या कालावधीकरीता अथवा सदर पदावर नियमित नियुक्ती होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल, तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आली. सदर प्रतिनियुक्तीची मुदत दि.१२.०४.२०२० रोजी संपुष्टात आली आहे. सार्वजनिक आरोग्य विभागाने संदर्भ क्र.४ येथील दि.२५.११.२०२१ रोजीच्या पत्रान्वये, सदर प्रतिनियुक्तीस दि.१३.०४.२०२० ते दि.१२.०४.२०२१ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी दिली आहे.

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या उपरोक्त कार्योत्तर मंजूरीच्या अनुषंगाने, खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून, डॉ.सुभाष शा. घाटकर, वैद्यकीय अधिकारी, गट-अ यांच्या प्रमाणक शल्य चिकित्सक, गट-अ, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई या पदावरील प्रतिनियुक्तीस दि.१३.०४.२०२० ते दि.१२.०४.२०२१ या कालावधीकरीता द्यावयाच्या मुदतवाढीस कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे -

अ) डॉ.सुभाष घाटकर, वैद्यकीय अधिकारी यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन /सक्षम प्राधिकाऱ्यास म्हणजे सार्वजनिक आरोग्य विभागास राहील.

ब) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला म्हणजेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागास राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने, सक्षम प्राधिकाऱ्याला म्हणजेच सार्वजनिक आरोग्य विभागास तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

क) डॉ.घाटकर यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची नोटीस उद्योग, ऊर्जा व कामगार विभागास दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा उद्योग, ऊर्जा व कामगार विभागास राहील.

ड) डॉ.घाटकर यांना त्यांच्या वैद्यकीय अधिकारी या पदाचे स्थायित्व लाभ प्रमाणपत्र अद्याप देण्यात आलेले नाही. तरी त्या पदाचे स्थायित्व लाभ प्रमाणपत्र मिळण्याच्या अधीन राहून सदर प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्यात येत आहे.

इ) डॉ.घाटकर यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ३९ व ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतुदी व त्या नियमाखालील परिशिष्ट तीन मधील तरतूदी लागू राहतील. तसेच सामान्◌ा प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दिनांक १७/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदी देखील लागू राहतील.

ई) डॉ.घाटकर यांच्या सेवाविषयक बाबी या त्यांच्या मूळ विभागामार्फत म्हणजेच सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत हाताळल्या जातील.

२. डॉ.सुभाष शा. घाटकर, वैद्यकीय अधिकारी यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सार्वजनिक आरोग्य विभाग व उद्योग, ऊर्जा व कामगार विभागामार्फत हाताळण्यात येतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०१२११२१३५१४३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, pseudonym=873F0744FC52A040F02A5627B7E5D792D665CCD9, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2022.01.21 12:14:04 +05'30'

**(अशोक मांडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

५. आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई.

६. उप सचिव (सेवा-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, गो.ते. रुग्णालय संकुल, १० वा मजला, मुंबई.

७. उप सचिव (कामगार-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.

९. डॉ. सुभाष शा. घाटकर, वैद्यकीय अधिकारी (मार्फत :- संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.)

१०. निवड नस्ती.